**दि कराड अर्बन को-ऑप बँक लि.,कराड, जि.सातारा या संस्थेस महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम २४-अ नुसार राज्य शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून अधिसूचित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय, क्र. प्रशिक्षण-२०१६/ प्र. क्र.१९०/२२-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (वि.) मुंबई -४०००३२
दिनांक : २० डिसेंबर, २०२१ .

**संदर्भ :** १) शासन परिपत्रक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. प्रशिक्षण -१०१४/ प्र.क्र.२३ /२२-स, दिनांक १० सप्टेंबर, २०१४.
२) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, पुणे यांचे पत्र क्र.
i) ४-सआ/कायदा/क२४क/राशिप्रसं/कराड अर्बन बँक/२०१६/५३९, दिनांक १०.११.२०१६
ii) ४-सआ/कायदा व वैधा.कार्य./कराड अर्बन बँक/प्र.सं.मा./२०१९, दिनांक १४.०१.२०१९.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम २४-अ मध्ये प्रत्येक संस्था, राज्य शासन राजपत्रातील अधिसूचनेद्वारे विनिर्दिष्ट करील अशा, राज्य संघीय संस्थांमार्फत किंवा राज्य शिखर प्रशिक्षण संस्थांमार्फत आपले संचालक, सदस्य, अधिकारी आणि कर्मचारी यांच्याकरीता सहकार शिक्षण व प्रशिक्षण आयोजित करील, अशी तरतुद करण्यात आली आहे. महाराष्ट्राची आर्थिक पहाणी सन २०२०-२१ नुसार राज्यात ३१ मार्च, २०२० अखेर सुमारे २.१२ लाख सहकारी संस्था कार्यरत असून एकूण सभासद संख्या सुमारे ५.५ कोटी एवढी आहे. या संस्थांच्या संचालकांची संख्या सुमारे २५ लाखांपेक्षा जास्त असून कर्मचारी संख्या सुमारे ३.५ लाख आहे. सहकार कायद्यातील कलम २४-अ नुसार सहकारी संस्थेने त्यांचे सदस्य, संचालक, व अधिकारी/ कर्मचारी यांना सहकार शिक्षण व प्रशिक्षण देणे अनिवार्य आहे.

उपरोक्त बाब विचारात घेता सहकार विषयक प्रशिक्षण देणा-या संस्थांना राज्य शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून मान्यता देण्याकरीता संदर्भ क्र. १ येथील परिपत्रकान्वये निकष विहीत करण्यात आले आहेत. महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम २४-अ नुसार राज्यातील काही संस्थाना राज्यशिखर प्रशिक्षण संस्था म्हणून अधिसूचित करण्यात आले आहेत. तथापि, राज्यातील सहकारी संस्थांच्या सभासदांची मोठी संख्या लक्षात घेता, व या सभासदांना ५ वर्षामध्ये किमान एकदा प्रशिक्षण देणे बंधनकारक असल्याने अजुनही काही संस्था प्रशिक्षण संस्था म्हणून अधिसूचित करणे आवश्यक आहे. याअनुषंगाने **दि कराड अर्बन को-ऑप बँक लि., कराड, जि.सातारा** या संस्थेस महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम २४-अ नुसार राज्य शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून अधिसूचित करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

या संदर्भात महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम २४-अ नुसार सहकारी शिक्षण व प्रशिक्षण देण्यासाठी राज्य शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून अधिसूचित करावयाच्या संस्थांच्या प्रस्तावाची छाननी करणाऱ्या समितीने दिनांक १३.०६.२०१६ रोजीच्या सभेमध्ये घेतलेल्या निर्णयानुसार सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्रमांक २ (i) येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील कलम २४-अ उप कलम (१) याद्वारे शासनास प्राप्त अधिकाराचा वापर करुन "**दि कराड अर्बन को-ऑप बँक लि., कराड**", या संस्थेस राज्य शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून अधिसूचित करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे. या संदर्भातील अधिसूचना राजपत्रामध्ये प्रसिद्ध करण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येत आहे. सदर संस्थेची मान्यता पुढील अटी व शर्तींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

१) दि कराड अर्बन को-ऑप बँक लि., कराड, जि.सातारा या संस्थेने त्यांच्या उपविधीमध्ये त्यांच्या कार्यक्षेत्रात (Area of Operation) मध्ये "संपूर्ण महाराष्ट्र कार्यक्षेत्र" असा बदल तत्काळ करुन घ्यावा व त्यास सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांची मंजूरी घ्यावी व त्याप्रमाणे सहकार आयुक्त व निबंधक,पुणे यांनी तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

२) संस्थेने प्रशिक्षण केंद्राची इमारत, वस्तीगृह, निवासाची सुविधा वा इतर सुविधांबाबत किमान पाच वर्ष कालावधीचा नोंदणीकृत भाडे करारनामा करणे आवश्यक आहे. तद्नंतर पुढील पाच वर्षासाठी करार करुन त्याचा अहवाल सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांना सादर करण्यात यावा.

३) वरील संस्थेने दिलेल्या प्रशिक्षणाबाबतचा तिमाही अहवाल सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांना सादर करण्यात यावा व त्या अहवालाची एक प्रत शासनाकडे पाठविण्यात यावी.

२. उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक क्रमांक २०२११२२०१३३९३४६६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

SHINGADE ANKUSH PANDURANG

Digitally signed by SHINGADE ANKUSH PANDURANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, pseudonym=18BA78965A42BF3AA081DE760471DB6306C88F1D, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=SHINGADE ANKUSH PANDURANG
Date: 2021.12.20 13:41:26 +05'30'

**(अं.पां.शिंगाडे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई.
५) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) मा.प्रधान सचिव (सहकार व पणन ) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) सर्व विभागीय सहनिबंधक (प्रशासन/लेखापरिक्षण), सहकारी संस्था
९) सर्व सह/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, दि कराड अर्बन को-ऑप बँक लि., कराड, सेवा प्रशिक्षण व संशोधन केंद्र, विद्यानगर सद्गुरु गाडगे महाराज कॉलेज जवळ, कराड-मसूर रस्ता विद्यानगर, कराड, जि.सातारा- ४१५ १२४.
११) निवडनस्ती, कार्यासन-२२-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.